**कोराडी औष्णिक विद्युत प्रकल्प विस्तारीकरणासाठी लागणा-या खर्चासाठी महानिर्मिती कंपनी मर्यादितमध्ये भांडवली गुंतवणूक सन २०१४-२०१५**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र.निधीवि-२०१४/प्र.क्र.४४(४)/ऊर्जा-३,**
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक ३१ मार्च,२०१५

**<u>संदर्भ</u> :-** १. शासन परिपत्रक क्र. बियुडी-२०१४/२०१४-२०१५/(७७०)अर्थसंकल्प-३ दिनांक ०९ एप्रिल, २०१४
२. शासन परिपत्रक क्र. बियुडी-२०१४/२०१४-२०१५/(७७०)अर्थसंकल्प-३ दिनांक ०९ जूलै, २०१४
३. शासन निर्णय क्र निधीवि-२०१५/प्र.क्र.४४/ऊर्जा-३ मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ दिनांक ३१/०३/२०१५

**प्रस्तावना :-**

कोराडी औष्णिक विद्युत प्रकल्प विस्तारीकरणासाठी येणा-या खर्चापैकी २०% इतकी रक्कम भांडवली गुंतवणूकीच्या स्वरुपात राज्य शासनाने महानिर्मिती कंपनीस उपलब्ध करुन द्यावयाची आहे. सदर रक्कम उपलब्ध करुन देण्यासाठी सन २०१४-१५ या वर्षामध्ये रु.४३६,५९,०७,०००/- इतकी सुधारित अर्थसंकल्पिय तरतुद पुनर्विनियोजनाद्वारे करण्यात आली आहे. सदर रक्क्म महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित, मुंबई यांना समायोजनाद्वारे वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

कोराडी औष्णिक विद्युत प्रकल्प विस्तारीकरणासाठी राज्य शासनाची भांडवली गुंतवणूक म्हणून रु.४३६,५९,०७,०००/- (रुपये चारशे छत्तीस कोटी एकोणसाठ लाख सात हजार फक्त) इतकी रक्कम समायोजनाद्वारे वितरीत करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे,त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

३. वरील बाबींचा खर्च "मागणी क्रमांक के-११, ४८०१ वीज प्रकल्पावरील इतर भांडवली खर्च,०२ औष्णिक विद्युत निर्मिती, ८०० इतर खर्च, (०१) राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (०७) कोराडी औष्णिक वीज केंद्र विस्तारीकरण योजनेमध्ये भांडवली गुंतवणूक (४८०१३६१५) ५४ गुंतवणूक” या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकावा व तो सन २०१४-२०१५ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधुन समायोजित करण्यात यावा.

४. वरील मंजूर झालेल्या भागभांडवलाची संपूर्ण रक्कम महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादीत यांना रोख न देता पुढे दर्शविल्याप्रमाणे महानिर्मिती कंपनीकडून शासनास येणे असलेल्या रकमेपोटी वसूल करण्यात यावी, आणि खाली नमूद केलेल्या जमा लेखाशिर्षाखाली समायोजनाद्वारे जमा करण्यात यावी.

| अ.क्र. | तपशील | रक्कम रुपये | जमा लेखाशिर्ष |
|---|---|---|---|
| १. | वित्तीय वर्ष सन २०१४-१५ या वर्षातील भाडेपट्टीपोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम | रु.३२१,५४,००,०००/- | ०८०१ वीज, (२२) इतर जमा रकमा, (२२)(०१) इतर जमा रकमा - महाराष्ट्र राज्य वीज मंडळाकडून मिळणारी भाडेपट्टीची रक्कम |
| २. | वित्तीय वर्ष सन २०१४-२०१५ या वर्षातील शासनाने दिलेल्या कर्जाच्या मुद्दलापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम | रु.३१,६३,००,०००/- | ६८०१ - वीज प्रकल्पासाठी कर्जे, २०२ औष्णिक वीज निर्मीती, (००)(०१) महाराष्ट्र राज्य विद्यूत मंडळास कर्जे (६८०१५०२१) |
| ३ | वित्तीय वर्ष सन २०१४-२०१५ या वर्षातील शासनाने दिलेल्या कर्जावरील व्याजापोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम | रु.५,६३,००,०००/- | ००४९ व्याजाच्या रकमा, १९० सरकारी उपक्रम यांचेकडून व्याज, (०१)सरकारी क्षेत्र व इतर उपक्रम यांचेकडून व्याज (०१)(०३)महाराष्ट्र राज्य वीज मंडळास दिलेल्या कर्जावरील व्याज |
| ४ | वित्तीय वर्ष सन २०१४-१५ या वर्षातील हमीपोटी या आदेशान्वये समायोजित करावयाची रक्कम | रु.६,७५,००,०००/- | ००७५ संकीर्ण, सर्वसाधारण सेवा, १०८ हमी फी, (००)(०१)(००७५००५८) |
| ५. | वित्तीय वर्ष सन २०१४-१५ या वर्षातील के.एफ.डब्ल्यूजर्मन कंपनीच्या कर्जाच्या रकमेच्या हप्त्यापोटी समायोजित करावयाची रक्कम | रु.७१,०४,७०,०००/- | ६८०१ - वीज प्रकल्पासाठी कर्जे, (००)१९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे ०० (०२) सौर ऊर्जा प्रकल्पासाठी महानिर्मिती कंपनीस कर्ज (६८०१५१४८) |
| | | रु.४३६,५९,०७,०००/- | |

४. सदर रकमेचे पुस्तकी समायोजन, महालेखापाल मुबई यांचे अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्यायने या रकमेचे देयक तयार करण्यात येऊ नये.

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१ मुंबई यांनी त्यांच्य अखत्यारीत व अधिकारात रु.४३६,५९,०७,०००/- (रुपये चारशे छत्तीस कोटी एकोणसाठ लाख सात हजार फक्त) चे पुस्तकी समायोजन करुन शासनास तसे कळवावे.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५६/१/१४६१ दिनांक ३०/०३/२०१५ नुसार दिलेल्या सहमतीने तसेच वित्त विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र.१९५/१५/ व्यय - १६ दिनांक ३१/०३/२०१५ मधील मंजूरीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०४०९१७३१११६६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas M Rajurkar

Digitally signed by Vilas M Rajurkar
DN: CN = Vilas M Rajurkar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.04.09 17:41:50 +05'30'

**(वि.म.राजुरकर)**
शासनाचे अवर सचिव

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई ४०००२०
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. निवासी लेखा अधिकारी,मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय मुंबई.
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मीती कंपनी मर्यादित, प्रकाशगड वांद्रे (पूर्व), मुंबई-५१.
६. मुख्य अभियंता विद्युत, सार्वजनिक बांधकाम विभाग, बांधकाम भवन, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई-४००००१.
७. नियोजन विभाग (का-१४६१), मंत्रालय, मुंबई ४०००३२.
८. वित्त विभाग (अर्थसंकल्प-१४/व्यय-१६/ऋण व हमी कक्ष/साधनसंपत्ती कक्ष/सा.उ. कक्ष), मंत्रालय, मुंबई-३२.
९. अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई ४०००३२.
१०.क.अ. (प्रशासन-१),उद्योग, ऊर्जा व कामगार मंत्रालय, मंबई ४०००३२.
११. निवड (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा व कामगार मंत्रालय, मंबई ४०००३२.